# प्रिय बाओबाब

लेखक: चेरील फोगो

चित्रे: क्यूं लेंग

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन

हॅलो, माझ्याच वयाच्या,

वृक्षमित्रा,

आफ्रिकेतल्या आपल्या गावापासून दूर, मायको आपल्या काका-काकींसोबत राहातो. आपलं आधीचं घर आठवलं की त्याला त्याच्या गावाच्या मध्यभागी असलेलं विशाल बाओबाब (मोठा बुंधा असलेलं एक फळझाड) झाडसुद्धा आठवतं. त्याच्या नव्या घरी लावलेल्या फरच्या झाडाविषयी त्याला फार जिव्हाळा आहे. त्या झाडाचं वय आपल्याइतकंच आहे, हे कळल्यावर तर त्याला झाडाबद्दल जास्तच प्रेम वाटू लागतं.

त्याच्या आवडत्या बाओबाबसारखंच हे झाडसुद्धा त्याच्याशी गप्पा मारतं आणि मायको आपली सारी गुपीतं त्याला सांगतो. पण आपल्या लहानग्या फरला कापणार आहेत, हे जेव्हा मायकोला कळतं तेव्हा तो त्याला वाचवायचा प्रयत्न करतो. त्यात त्याला यश मिळतं का?



कमी उंचीच्या उंच-सखल पर्वतरांगांनी वेढलेल्या एका शहरात एका रुंद रस्त्यावर असलेल्या एका घरात छोटंसं फरचं झाड उगवलं होतं.

त्या घरात राहाणारा मुलगा नेहमी त्या झाडानजिक दगडी पायऱ्यांवर बसून, झाडाचा आवाज ऐकत असे. त्याला वाटत असे की झाड त्याचं नाव गुणगुणतंय.

“मा....य....को.”



आफ्रिकेच्या ज्या गावात मायकोचा जन्म झाला होता, तेथील विशाल बाओबाब झाड त्याला खूप आठवायचं. त्या झाडाच्या सावलीत, इतर मुलांसोबत बसून, तो काजू खात असे. गावातल्या त्या मुलांनी कधी त्याच्या सरळसोट उभ्या कानांकडे लक्ष दिलं नव्हतं.

पण मायको आता त्या विशाल बाओबाब झाडांच्या संगतीत राहात नव्हता.





आता तो लाल विटांनी बनलेल्या एका घरात आपले काका पीटर आणि अजिया काकीसोबत राहात होता. कधी कधी पीटरकाका आणि मायको उंच देवदार वृक्षांच्या जंगलात फिरायला जात. आपली मान वर करून मायको झाडांच्या शेंड्यांकडे बघायचा प्रयत्न करत असे, पण त्याला ते जमत नसे.

“काका,” तो विचारत असे, “ही झाडं किती जुनी आहेत?”

“चारशे वर्ष जुनी असावीत,” पीटर काका उत्तर देत आणि मग, मायको काय विचार करत आहे, हे जणू माहीत असल्याप्रमाणे ते हसून म्हणत, “तुझ्या बाओबाबइतकं मोठं नाही काही.”

मायकोचा प्रिय बाओबाब 2000 वर्षांपेक्षाही जुना होता. “जेव्हा हा महाकाय बाओबाब एक छोटंसं रोपटं होतं, तेव्हा तो मोठा डोंगर एका छोट्याशा खड्याएवढा होता,” आई त्याला सांगत असे.

एकदा सकाळी मायको छोटयाशा फरच्या रोपट्यानजिक बसला होता, तेव्हा पीटर काकाही त्याच्याजवळ येऊन दगडी पायरीवर बसले.

“काका,” मायकोने विचारलं, “या झाडाचं वय किती आहे?”

“सात वर्ष असावं,” ते म्हणाले आणि मग थोड्या वेळाने बोलले, “किती विचित्र जागेवर उगवलंय हे रोपटं.” मग मायकोच्या हनुवटीला हलवून ते घरात गेले.

त्या दिवसानंतर, घरातून बाहेर निघताना आणि परतताना मायको त्या झाडाशी बोलत असे, “हॅलो, वृक्षमित्रा, तुझं वय माझ्याइतकंच आहे.” कधी कधी तो झाडानजिक पायरीवर बसत असे आणि इतरांपासून दडवलेली आपली गुपीतं झाडाला सांगत असे. तो आपल्या गावाबद्दल आणि तिथल्या विशाल बाओबाब झाडाबद्दल रोपट्याला सांगत असे. आपल्या आईवडिलांच्या मृत्युनंतर तो ज्या शाळेत शिकायला जायचा, तेथील मित्रांबद्दल तो बोलत असे. जेव्हा वाऱ्याने त्याचं विमान उडवत समुद्रापार आणलं तेव्हा त्याला किती एकाकी वाटतं होतं, हे त्याने झाडाला सांगितलं. त्याने हेसुद्धा सांगितलं की सुरुवातीला लाल विटांच्या या घरात झोपणं त्याला विचित्र वाटत असे.

“पण आता,” तो म्हणाला, “अज़िया काकी आणि मी बेडरूमच्या भिंतीवर काढलेल्या बाओबाब झाडाचं चित्र बघता बघता मला झोप लागते.”



मायकोने झाडाला आपल्या नव्या शाळेबद्दल आणि त्याचे कान बघून हसणाऱ्या *लिओनार्द* नावाच्या मुलाबद्दल सांगितलं.

उंच-सखल पर्वराजींनी वेढलेल्या शहरात काळ सरकू लागला. फरच्या झाडाच्या गाण्यामधून मायकोला बऱ्याच गोष्टी समजल्या. उदाहरणार्थ, झाडाची मुळं मातीत खोलवर लपलेलं पाणी कसं शोषून घेतात, सूर्याची उष्णता कशी पितात, छोटे छोटे पक्षी झाडाच्या फांद्यांवर घरटी बनवतात तेव्हा त्यांची सुमधुर गाणी झाड कसं ऐकतं. झाडाच्या फळातून निघून छोटंसं बी मातीत खोलवर कसं अंकुरतं, हे त्याला उमगलं. त्याला हेदेखील कळलं की त्याचे कान खूप चांगले होते, कारण फक्त तेच छोट्या झाडाचं गाणं ऐकू शकत होते.



एकदा मायकोने पीटरकाका आणि अजियाकाकी यांना बागेत गप्पा मारताना ऐकलं.

“काहीतरी करायला हवं.”

“हे घराच्या पायाला तडा पाडू शकतं.”

आणि मग, “झाडासाठी ही जागा योग्य नाही.”

वारा दु:खाने उसासा टाकतोय असं मायकोला वाटलं. त्या छोट्याशा झाडाचं मायकोला दु:ख वाटलं, कारण ते चुकीच्या जागी उगवलं होतं.

“अजिया काकी,” त्या रात्री गोष्ट ऐकल्यावर त्याने विचारलं, “पाया काय असतं?”

“हाडं. आपली हाडं जशी आपल्या शरीराला आकार देऊन सरळ ठेवतं तसंच पाया घराला सरळ उभं ठेवतं.”

खोलीतला दिवा मालवून काकी बाहेर पडली. मंद प्रकाशात मायको भिंतीवर काढलेल्या बाओबाबच्या चित्राकडे बघू लागला.



दररोज शाळेतून परतल्यावर पोस्टाच्या पेटीखाली नेहमीच्या जागेवर छोटंसं झाड दिसलं की मायको आनंदीत होत असे.

मग दिवस छोटे होऊ लागले. इतर झाडांची पानं गळून छोट्या फरच्या फांद्यांवर जमा होऊ लागली.

त्याच्या पहिल्या *हॅलोवीन*च्या सणाला अजिया काकीने मायकोच्या वर्गातल्या *ली* या मुलाला घरी येण्याचं आमंत्रण दिलं. ली जादूगार बनला. मायको बाओबाबचं झाड बनला. यासाठी त्यांनी एक डबा, नळकांड्या आणि हिरवा कागद ही साधनं वापरली. ली ने त्याला *ट्रीक-ओ-ट्रीट* (हॅलोवीनमध्ये बोलण्याची मुलांची खास भाषा) बोलायला शिकवलं.

त्यांना रस्त्यावरून जाणारा लिओनार्द दिसला. त्याने मायकोच्या कानाकडे इशारा केला आणि जोरजोरात हसू लागला. मायको म्हणाला, “लिओनार्द माझ्या कानांवर हसला नाही तर आवडेल मला!” पण मग मायकोला आठवलं की त्याचे कान तर खूप चांगले होते, कारण ते छोट्या फरच्या झाडाचं गाणं ऐकू शकत होते.



आता फरच्या झाडाची शेवटची उरलेली सुकी, तपकिरी पानं वाऱ्यावर गरगरू लागली. एकदा मायकोने शाळेतून परतताना दगडी पायऱ्यांवर एक कुऱ्हाड आणि एक करवत बघितली. त्याने दोन्ही अवजारं शेडमागे एका काळोख्या जागेत लपवली. मग तो झाडाच्या जवळ बसला. “तू वाढून खूप उंच व्हावंस, असं मला वाटतं. एवढं उंच की समुद्रापार असलेल्या माझ्या विशाल बाओबाबला बघू शकशील आणि त्याला माझ्यातर्फे हॅलो म्हणशील.”

फरच्या झाडाला कंप सुटला.

“प्लीज, तुझी मुळं हाडांपासून लांबच ठेव,” मायको म्हणाला. “



त्या रात्री, जेवताना, काकांनी अवजारं बाहेर का ठेवली, या कारणावरून, अजिया काकी पीटर काकांवर रागावली. “म्हणजे, सगळं जग चोरी करायला मोकळं होतं.” त्यांची परवानगी घेऊन मायको बेडरुममध्ये झोपायला गेला. पण त्याला झोप येत नव्हती.

दिवस सरू लागले तसे थंडी वाढू लागली. अजिया काकी आणि पीटर काका कुऱ्हाड आणि करवत हरवल्याची गोष्ट विसरून गेले.

शाळेत मिसेस *क्रॉफ्ट* यांनी मुलांना स्केटस् (बर्फातली गाडी), बर्फ, घोड्यांची घसरगाडी वगैरेंबाबत माहिती दिली. या गोष्टी मायकोला माहीत नव्हत्या. संगीत खोलीत तो लिओनार्दपासून दूर ली जवळ बसला.





डिसेंबरमध्ये एकदा मायको शाळेतून घरी परतत होता. एक थंडगार, पांढराशुभ्र मोती त्याच्या पापण्यांवर येऊन पडला. त्याने पापण्या मिटल्या. अनेक मऊमऊ, पांढरे मोती सभोवती पडू लागले. त्याने त्यांना स्पर्श करू पाहिलं तर ते लुप्त झाले. तो घरच्या दिशेने पळू लागला, तेवढ्यात त्याला नवी कुऱ्हाड हाती घेऊन दगडी पायऱ्यांजवळ उभे असलेले पीटर काका आणि अजिया काकी दिसले.

त्यांनी हसत हसत हात मिळवून त्याचं अभिनंदन केलं. अजिया काकी म्हणाली, “हे छोटंसं फरचं झाड आपलं ख्रिसमस ट्री असेल!”

मायको धावू लागला, रुंद रस्त्यावर, डोंगराखाली, जंगलपार, दुसऱ्या डोंगरावर. त्याचे कान थंडगार पडले तरीही त्याने पर्वा केली नाही. त्याला आपल्या कानांचा तिरस्कार वाटू लागला, त्याला बर्फाचा आणि आपल्या खोलीतल्या भिंतींचा आणि घोड्यांच्या घसरगाडीच्या गाण्यांचा तिरस्कार वाटू लागला.

त्याला धाप लागली. महासागरापार धाव घेऊन आपल्या आफ्रिकेच्या घरात पोहोचायला किती वेळ लागेल? त्याला प्रश्न पडला. तिथे कुणी त्याच्या उभ्या सरळसोट कानांना हसत नव्हतं आणि त्याचा महाकाय बाओबाब सुरक्षित आपल्या जागी उभा असे.

मायको छोटा असला तरी बरंच काही माहीत होतं त्याला. त्याला माहीत होतं की आपण सांगितलेली कृती झाड करू शकत नव्हतं. त्याला माहीत होतं की कुऱ्हाड व करवत लपवणं चुकीचं होतं. त्याला माहीत होतं की छोटं असणं आणि चुकीच्या जागी राहाण्याचं दुःख काय असतं.

थोड्या वेळाने, पीटर काका त्याला शोधत तिथे आले. दोघं एकत्र चालू लागले. बर्फावर त्यांच्या पावलांचे आवाज दबू लागले. काही वेळानंतर, पीटर काका म्हणाले, “तू मला सांगितलं का नाहीस की तुझं त्या झाडावर खूप प्रेम आहे ते?”

मायको उत्तर देऊ शकला नाही.

पीटर काकाने त्याच्या मनातली गोष्ट समजून घेतली. ते म्हणाले, “तू स्वतःला परका समजत असशील तर ही गंभीर बाब आहे.” त्यांनी मायकोच्या डोळ्यांत पाहिलं आणि म्हणाले, “सगळं काही ठीक होईल, बाळा.” ते चालत राहिले.



पीटर काकाने मायकोची हनुवटी हलवली. “आपण छोट्या झाडाला कापायचं नाही,” ते म्हणाले.

“पण पायाचं काय करायचं?”

“त्यावरही उपाय शोधू आपण.”

मायकोला आपल्या मनावरचं उदासीचं मळभ दूर झाल्यागत वाटलं. त्याने पीटर काकांना सांगितलं की त्याला स्वप्नातसुद्धा बाओबाब झाड दिसतं. त्याने त्यांना लिओनार्दबद्दलही सांगितलं.

ते लिओनार्दबद्दल बोलत होते तेव्हा अंधार पडू लागला. रुंद रस्त्यावर येईपर्यंत आभाळात तारे लुकलुकू लागले. मायको लक्षपूर्वक ऐकू लागला. त्याला भास झाला की छोटंसं झाड त्याचं नाव गुणगुणत होतं.

ख्रिसमसच्या आधी मायकोने बिस्किटं बनवायला अजिया काकीला मदत केली. ही बिस्किटं बाओबाब आणि फरच्या झाडांच्या आकाराची होती. ख्रिसमसच्या सकाळी ली आपले नवे स्केट्स घालून आला. तो मायकोला आपल्या बर्फगाडीत बसवून जंगलानजिक गोठलेल्या बर्फाच्या झऱ्यातून खेचत नेऊ लागला. त्यांना लिओनार्द दिसला. तो मायकोच्या कानावर हसला नाही.



वसंत ऋतुत एकदा मायकोचा आठवा वाढदिवस होता. दगडी पायऱ्यांवर बसून तो ली ची वाट बघत होता. ली आपल्या वडिलांसोबत त्यांच्या ट्रकमधून येणार होता. मायकोने झाडाला आपली आवडती गोष्ट सांगितली – त्या दिवसाची गोष्ट, जेव्हा त्याला आणि पीटर काकांना *जन्मस्थळ* जंगल सापडलं होतं. “तिथे लोक आपल्या वाढदिवशी झाडं लावतात. तू माझं झाड असशील,” मायको म्हणाला. “तुला आवडेल तिथे. तिथे तू खूप उंच होशील – ज्या जंगलात तुझा जन्म झाला होता तिथल्या सर्वात उंच झाडाहून उंच होशील तू.”

मायकोला ट्रकचा आवाज आला. “पीटर काका,” तो ओरडला. “झाड घेऊन जायला आलेयत बघा ते!”

मायकोने छोट्याशा फरच्या झाडाकडे बघितलं. “मी तुला बघायला येत जाईन. मी आल्यावर म्हणेन, हॅलो, वृक्षमित्रा, तू माझ्याच वयाचा आहेस.” मग तो पुटपुटला, “तुला माहितीय का, जिथे आपला जन्म होतो तिथेच आपण मोठे होतो असं नाही. आपण कुठेही मोठं होऊ शकतो.”



